**सन २०२४-२५ आर्थिक वर्षासाठी, राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून सर्व डीटीओ (DTO) यांना पुरविण्यात येणाऱ्या सेवेचे त्रैमासिक शुल्क अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो- २०२५/प्र.क्र.०४/टिएनटी-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई- ४०० ०३२,
दिनांक: १३ मार्च, २०२५

वाचा:-

1. **शासन निर्णय क्र.अंनियो ३४१५/प्र.क्र. २७६/टिएनटी ६, दि. १९/०९/२०१९**
2. **शासन निर्णय क्र.अंनियो-२०१९/प्र.क्र.३५/टिएनटी ६, दि. ०५/०२/२०२१**
3. **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४**
4. **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १२/०२/२०२५**

प्रस्तावना:-

जिल्हा परिषदा, मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी लागू असलेली परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना केंद्र शासनाच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत समाविष्ट करण्याची कार्यपध्दती शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र.(१) च्या शासन निर्णयान्वये विषद केली आहे. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत डीटीओ (DTO) यांना केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून दिल्या जाणाऱ्या सेवेसाठी सेवाशुल्क अदा करण्यासाठी शासनाकडून अनुदान प्राप्तीसाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याकरिता संदर्भ क्र. (२) अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (४) येथील शासन परिपत्रकान्वये, सन २०२४-२५ आर्थिक वर्षासाठी, खालील नमूद लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत तरतूदीमधून वित्त विभागाने वितरीत केलेला एकूण ८०% निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून सर्व डीटीओ (DTO) यांना पुरविण्यात येणाऱ्या सेवेचे त्रैमासिक शुल्क अदा करण्यासाठी २२०२ आय८७१, २२०२ आय८८२ व २२०२ आय८९१ या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूदीपैकी ८०% निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत केला आहे.

त्यापैकी शासन निर्णय, दिनांक २४/०१/२०२५ नुसार मूळ तरतूदीच्या ६०% निधी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना यापूर्वी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. आता, वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी उर्वरित २० % इतका निधि अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना खालील विवरणपत्रानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **योजनेचे नाव व लेखाशिर्ष** | **सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पित निधी** | **सन २०२४-२५ सुधारित अंदाज** | **शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय दिनांक २४/०१/२०२५ अन्वये वितरीत निधी (६०%) सन २०२४-२५** | **वितरित करावयाचा उर्वरित निधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, १०२, अशासकीय प्राथमिक शाळांना सहाय्य, (०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०२), अशासकीय प्राथमिक शाळांना सहाय्य-केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणास सेवाशुल्क (अनिवार्य), २८, व्यावसायिक सेवा, (२२०२ आय ८७१) | १७६८ | १४१४ | १०६०.८ | ३५३ |
| २ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०३),परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०२), जिल्हा परिषदांना सहाय्य-केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणास सेवाशुल्क (अनिवार्य), (२२०२ आय ८८२) | ६६०७ | ५२८६ | ३९६४.२ | १३२१ |
| ३ | ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०२, माध्यमिक शिक्षण, ११०, अशासकीय माध्यमिक शाळांना व कनिष्ठ महाविद्यालयांना सहाय्य, (०१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (०२), अशासकीय प्राथमिक शाळांना सहाय्य-केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणास सेवाशुल्क (अनिवार्य), २८, व्यावसायिक सेवा, (२२०२ आय८९१) | ९१६९ | ७३३५.२ | ५५०१.४ | १८३३ |
| | **एकूण** | १७५४४ | १४०३५.२ | १०५२६.४ | ३५०७ |

२. सदर खर्च वरील विवरणातील संबंधित लेखाशीर्षातून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या संबंधित लेखाशिर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागवावा. तसेच मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. या शासन निर्णयात मंजूर केलेली अनुदाने पुढील अटी व शर्तींच्या अधीन आहेत.

(१) उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

(२) ज्या उद्दिष्टासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा

(३) या शासन निर्णयानुसार उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

(४) संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दिनांक १९/०९/२०१९ नुसार राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे दिल्या जाणाऱ्या सेवेसाठी राज्य शासनाने त्यांच्याशी केलेल्या करारानुसार आणि सेवाशुल्कामध्ये वित्त विभागाने वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणास निधी अदा करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग १ वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दि.१७/०४/२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १२/०२/२०२५ मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१३१७०५०९८७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e891811863406 9a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C33 5D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.13 17:06:03 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
११. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
१२. अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
२२. सहसचिव / उपसचिव (विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेतर / प्रशासन / समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य./ प्राथमिक/प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT/महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
२४. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
२५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२७. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२८. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२९. वित्त विभाग (व्यय-५ /व्यय-१४ / अर्थसंकल्प -८) मंत्रालय, मुंबई
३०. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. निवड नस्ती (टीएनटी-६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.